शासकीय कर्मचा-यांवर/अधिका-यांवर होणारे हल्ले व त्यांना दमदाटी देणा-या धाकदपटशाची गंभीर दखल घेण्याबाबत.........

महाराष्ट्र शासन
गृह विभाग.

परिपत्रक क्रमांक: एमीएस-0598/महासंघ-1/पोल-13,
मंत्रालय, मुंबई - 400 032, दिनांक : ५ एप्रिल, 1999

## परिपत्रक

महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाने शासनाकडे अशी मागणी केली आहे की, शासकीय कर्मचारी/अधिकारी यांना मिळणा-या धमक्या व त्यांच्यावर होणारे हल्ले याबाबत उपाययोजना करावी. त्या अनुषंगाने असे आदेश देण्यात येत आहेत की, संबंधित सर्व पोलीस अधिका-यांनी अशा प्रकारच्या घटना घडू नयेत म्हणून सतर्क राहून दक्षता घ्यावी व आवश्यक त्या उपाययोजना कराव्यात

2. शासकीय कर्मचा-यांना मारहाण होणे अथवा धाकदपटशा दाखविणे ही गंभीर बाब आहे याबाबत महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघाच्या राज्यस्तरीय संयुक्त विचारविनिमय समितीच्या मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांच्या अध्यक्षतेखाली दि.12 जानेवारी, 1998 रोजी झालेल्या बैठकीत चर्चा झाली. याबाबत चर्चेअंती घेण्यात आलेल्या निर्णयानुसार सर्व संबंधित पोलीस अधिका-यांना असे आदेश देण्यात येतात की, यापुढे मारहाण अथवा धाकदपटशा घडल्याची तक्रार संबंधित शासकीय कर्मचा-या/अधिका-यांकडून प्राप्त झाल्यास चौकशी करुन संबंधित आरोपीविरुध्द गुन्हा नोंदवावा. ज्या प्रकरणी गुन्हा नोंदविण्यात आला आहे त्याचा सखोल तपास तत्परतेने करावा.

3. सर्व पोलीस आयुक्त/पोलीस अधीक्षकांनी वरील आदेशाची नोंद घेऊन ते त्यांच्या नियंत्रणाखालील/कार्यक्षेत्रातील सर्व पोलीस ठाण्यांच्या आणि पोलीस अधिका-यांच्या निदर्शनास आणावेत आणि त्याचे अनुपालन होईल याबाबत दक्षता घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

५/४/१९९९

( क. द. पाटील )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक (लोहमार्गासह),
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, गृह विभाग,
गृह विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख

(कृ.मा.१.)

क्रमांक: एमीएस-0596/महासंघ-1/पोल-13,
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - 400 032,
दिनांक : ५ एप्रिल, 1999.

प्रत, माहितीसाठी अग्रेषित,

मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.